निरा उत्पादक संस्थांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक: एमआयएस-०६१२/प्र.क्र.२११/राउशु-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ मे, २०१७.

वाचा :- १) शासन निर्णय, क्र.NEE-१८६७/G.७९४१-III, दि.१६ ऑगस्ट, १९६९.
२) शासन निर्णय, क्र.एमआयएस-०६१२/प्र.क्र.२११/राउशु-३, दि.६.९.२०१४.
३) आयुक्त, राउशु, मुंबई यांचे पत्र क्र.निरा.११२०१२/११५२/अकरा, दि.२२.३.२०१७.

**प्रस्तावना :-**

शासनाच्या प्रचलित नियम व धोरणानुसार निरा झाडे छेदणे व निरा विक्री केंद्र यासाठी नमूना एन-४ अनुज्ञप्ती प्रदान करण्याची तरतूद आहे. सध्याच्या अस्तित्वात असलेल्य नियम व धोरणानुसार निरा झाडे असलेल्या प्रत्येक जिल्हयात तालुकास्तरावर अथवा जिल्हास्तरावर झाडांच्या उपलब्धतेनुसार निरा उत्पादन व विक्री संस्था कार्यरत आहेत. संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये, १) कल्पतरु निरा उत्पादक सहकारी संस्था मर्यादित, सोलापूर, २) कृषी विज्ञान केंद्र, बारामती, पुणे व ३) कृषी सेवा इंटरप्रायजेस, मुरबाड, जि.ठाणे या संस्थांना त्यांनी उत्पादित केलेली निरा पॅकबंद करून संबंधित महसूल विभागाच्या कार्यक्षेत्रात विक्री करण्यासाठी दि.३०.६.२०१५ पर्यंत प्रायोगिक तत्वावर अटींच्या अधीन राहून देण्यात आली होती. यासंदर्भात विभागीय उपआयुक्त, पुणे यांनी सादर केलेल्या अहवालानुसार सदर संस्थांना ५ वर्षाची मुदतवाढ देण्याबाबत शिफारस केली आहे.

आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई यांच्या संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये, निरा नियमांतर्गत सुधारणा न करता शासन निर्णय, दि.१६ ऑगस्ट, १९६९ मधील तरतूदी रद्द केल्या तर खादी ग्रामोद्योग विभागाची परवानगी न घेता पॅकबंद निरा शहरी भागातील मॉल व फुड स्टोअर्स मधून विक्री होऊन मागणी वाढण्याची शक्यता नमूद करून निरा धोरणात बदल करण्याचे प्रस्तावित केले होते. आयुक्त, राउशु यांनी सादर केलेल्या प्रस्तावावर निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

खालील संस्थांना त्यांनी उत्पादित केलेली निरा पॅकबंद करून तिचे संबधित महसूल विभागाच्या कार्यक्षेत्रात प्रायोगिक तत्वावर विक्री करण्यासाठी शासन निर्णय, दि.६ सप्टेंबर, २०१४ अन्वये, विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून दि.३० जून, २०१५ पर्यंत परवानगी देण्यात आली होती.

१) कल्पतरु निरा उत्पादक सहकारी संस्था मर्यादित, माळीनगर, ता.माळशिरस, जि.सोलापूर व त्या संस्थेशी संलग्न असलेले शेतकरी श्री. निलकंठ भोगले, श्री.अजित गिरमे व श्री.भाऊसाहेब खटमारे.

२) कृषी विज्ञान केंद्र बारामती, जि.पुणे व त्या केंद्राशी संलग्न असलेले शेतकरी श्री.राजेंद्र तनपुरे व श्री.सदाशिव सातव.

३) कृषी सेवा इंटरप्रायजेस, मुरबाड, जि.ठाणे.

२. उपरोक्त संस्थांना त्यांनी उत्पादित केलेली निरा पॅकबंद करून तिचे संबधित महसूल विभागाच्या कार्यक्षेत्रात प्रायोगिक तत्वावर विक्री करण्यासाठी शासन निर्णय, दि.६ सप्टेंबर, २०१४ मध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून, दि.३० जून, २०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी दर ३ महिन्यांनी सदर प्रकरणाचा आढावा घ्यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०५१६१५२७१२२४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2017.05.16 17:11:33 +05'30'

**( पु. हि. वागदे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१ मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२ मा.मंत्री, राउशु यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३ मा.राज्यमंत्री, राउशु यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४ अपर मुख्य सचिव (गृह), राज्य उत्पादन शुल्क, मंत्रालय, मुंबई,
५ आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६ विभागीय उपआयुक्त, राज्य उत्पादन शुल्क (सर्व),
७ सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क
८ सर्व सह सचिव / उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
९ कल्पतरु निरा उत्पादक सहकारी संस्था मर्यादित, माळीनगर, ता.माळशिरस, जि.सोलापूर
१० कृषी विज्ञान केंद्र बारामती, जि.पुणे
११ कृषी सेवा इंटरप्रायजेस, मुरबाड, जि.ठाणे.
१२ निवड नस्ती (राउशु-३)